सार्वजनिक बांधकाम विभागातर्फे रस्त्याच्या हद्दित गॅस पाईप वाहिन्या टाकण्यास परवानगी देण्याबाबत सुधारणा.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग
शासन परिपत्रक क्रमांक : संकिर्ण-२०२०/प्र.क्र. ०४/रस्ते-७
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक :- १५.०२.२०२०

वाचा :- १. शासन निर्णय क्रमांक- संकिर्ण-२०१७/प्र.क्र.२४६/रस्ते-७, दि. ३० मे, २०१७
२. शासन परिपत्रक क्रमांक - संकिर्ण-२०१७/प्र.क्र.२४६/रस्ते-७, ३० मे, २०१७

परिपत्रक

सार्वजनिक बांधकाम विभागातर्फे रस्त्याच्या हद्दित विविध प्रकारच्या सेवावाहिन्या टाकण्यास परवानगी देण्यात येते. रस्त्याच्या हद्दीत सेवा वाहिनी टाकण्याची परवानगी त्याच्या प्रचलित पध्दतीत बदल करुन ई-संगणक प्रणाली महाराष्ट्र शासनाच्या "मैत्री (MAITRI) व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या mahapwd.com या संकेत स्थळावर उपलब्ध आहे, असे दिनांक ३० मे, २०१७ रोजीच्या शासन निर्णयात व परिपत्रकात नमूद केले आहे. त्यानुसार सेवा वाहिनी टाकण्याच्या परवानगी संदर्भात अर्ज प्राप्त झाल्यापासून मुख्य अभियंता यांनी १५ दिवसात मानीव परवानगी संगणक प्रणालीव्दारे निर्गमित करावी, अशा सूचना देण्यात आल्या आहेत.

२. सद्य:स्थितीत गॅस पाईप लाईन टाकण्याचे काम विस्तृत प्रमाणात व जलद गतीने व्हावे यासाठी परवानगी संदर्भात अर्ज प्राप्त झाल्यापासून ७ दिवसात परवानगी देण्याची कार्यवाही मुख्य अभियंता यांनी करावी व ७ दिवसात परवानगी न दिल्यास मानीव परवानगी संगणक प्रणालीव्दारे निर्गमित करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२००२१५१७०८२३२८१८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vishnu Patil
Digitally signed by Vishnu Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=PWD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4fc55962ce589eec1f41929dbe272d7066e091b5d0712a88c2f792c1b82a927d, cn=Vishnu Patil
Date: 2020.02.15 17:10:04 +05'30'

(वि. ल. पाटील)
कार्यासन अधिकारी महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. मंत्री (सार्वजनिक बांधकाम)यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्यमंत्री (सार्वजनिक बांधकाम)यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.

४) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन विभाग.

५) विकास आयुक्त(उद्योग), उद्योग संचालनालय, दुसरा मजला, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालय, मुंबई.

६) सर्व मुख्य अभियंते, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग (विद्युतसह)

७) संचालक, उद्याने व उपवने, मुंबई.

८) सर्व अधीक्षक अभियंते, सार्वजनिक बांधकाम विभाग (विद्युतसह)

९) अधीक्षक अभियंता यांनी आपल्या अधिनस्त विभागातील कार्यालयांना सदर शासन परिपत्रकाची प्रत अग्रेषित करावी.

१०) कार्यासन (निवड नस्ती).